राज्यातील अशासकीय अनुदानित समाजकार्य
महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना
सेवानिवृत्ती वेतन व उपदान योजना लागू करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीएसडब्ल्यू -२०१४/प्र.क्र.२१५/सामासु**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ .
तारीख: २९ ऑक्टोबर, २०१४

**प्रस्तावना —**

सामाजिक न्याय विभागाच्या अखत्यारीतील अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना महाविद्यालयाच्या स्थापनेच्या दिनांकापासून अंशदायी निवृत्तीवेतन योजना (Contributory Provident Fund) लागू होती. या कर्मचाऱ्यांनी त्यांना सेवानिवृत्ती वेतन व उपदान योजना लागू करणेबाबत मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ येथे याचिका क्र.६८२/२०१२ आणि याचिका क्र.३२७७/२०१२ व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र.४८०२/२०१० आणि याचिका क्र.७९५१/२०११ दाखल केल्या होत्या. या सर्व याचिकांमध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई तसेच मा.उच्च न्यायालयाचे नागपूर खंडपीठ यांनी समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना निवृत्तीवेतन व उपदान योजना लागू करण्याचे आदेश दिले आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाच्या निर्णयाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात शासनाने दाखल केलेली विशेष अनुमती याचिका तसेच पुनर्विलोकन याचिका मा. सर्वोच्च न्यायालयाने फेटाळली आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार सामाजिक न्याय विभागाच्या अखत्यारीतील अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती वेतन व उपदान योजना लागू करणेबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या बैठकीत सादर करण्यात आला. सदर प्रस्तावास मंत्रिमंडळाच्या दि.२८.८.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. मा.उच्च न्यायालय व मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार राज्यातील समाजकार्य महाविद्यालयात दि.०१.११.२००५ पूर्वी नियुक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती व उपदान योजना लागू करण्याचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय—**

सामाजिक न्याय विभागाच्या अखत्यारीतील अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना महाविद्यालयाच्या स्थापनेच्या दिनांकापासून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ नुसार अनुज्ञेय असलेली सेवानिवृत्ती व उपदान योजना, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना, या नियमातील सर्व तरतुदींसह तसेच त्यामध्ये वेळोवेळी झालेले बदल व सुधारणांसह योग्य त्या फेरफारासह दिनांक १.११.२००५ पूर्वी नियुक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती व उपदान योजना दि. २ सप्टेंबर १९९९ पासून लागू करण्यात येत आहेत.

२) या शासन निर्णयाच्या प्रयोजनार्थ

अ) अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालय म्हणजे खाजगी संस्थेव्दारा चालविण्यात येणारे, सामाजिक न्याय विभागा अंतर्गत येणारे व राज्यातील संबंधीत अकृषी विद्यापीठाशी संलग्नित असलेले व सामाजिक न्याय विभागातर्फे अनुदान मिळणारे समाजकार्य महाविद्यालय होय.

ब) समाजकार्य महाविद्यायीन शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयात पूर्णवेळ कार्यरत संचालक / प्राचार्य, प्राध्यापक, सहयोगी प्राध्यापक, सहाय्यक

प्राध्यापक, व्याख्याता / अधिव्याख्याता, ग्रंथपाल, निबंधक, अधिक्षक, लेखापाल, लिपीक टंकलेखक, फाईल क्लार्क, सहाय्यक ग्रंथपाल, व्यावसायिक सहाय्यक, ग्रंथालय सहाय्यक, शिपाई, पहारेकरी, सफाईगार, माळी, वाहन चालक, वसतीगृह अधिक्षक व इतर कर्मचारी जे विहीत केलेल्या आकृतिबंधाप्रमाणे आहेत व ज्यांना वेतनावर शासनामार्फत अनुदान दिले जाते.

३. या निर्णयानुसार अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयातून निवृत्त झालेले शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांचेकडून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील परिशिष्टानुसार निवृत्तीवतेनाबाबतचे कागदपत्र भरुन घेण्याची जबाबदारी संबंधित महाविद्यालयांच्या प्राचार्यांची राहील. शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्यात ही कार्यवाही पूर्ण करण्यात यावी. निवृत्तीवेतन प्राधिकृत करण्यासाठी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मध्ये देण्यात आलेल्या परिशिष्टानुसार कागदपत्रे तपासून महालेखापाल कार्यालयाकडे सादर करण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. महालेखापाल कार्यालयाकडून Pension Payment Order प्राप्त झाल्यानंतर कोषागार कार्यालयामार्फत निवृत्तीवेतन व त्याबाबतचे लाभ अदा करण्यात येतील. निवृत्तीवेतन मिळण्याकरिता संबंधित कर्मचाऱ्यांनी वित्त विभाग शासन निर्णय क्र. निवेयो-१००७/प्र.क्र.१२०/कोषा-प्र.५ दिनांक १८.८.२००८ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

४. अशासकीय अनुदानित समाजकार्य महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना अंशदायी निवृत्तीवेतन योजना लागू असल्यामुळे जे कर्मचारी निवृत्त झाले आहेत, त्यांना या योजनेंतर्गत जमा असलेल्या रकमेचे प्रदान करण्यात आले आहे. निवृत्तीवेतन व उपदान योजना लागू करावयाच्या शासनाच्या निर्णयामुळे अंशदायी निवृत्तीवेतन योजनेंतर्गत संस्थेचे अंशदान व त्यावरील व्याज ही रक्कम संबंधित कर्मचाऱ्याने शासनास परत करणे आवश्यक आहे. कर्मचाऱ्यांना अदा करण्यात आलेली ही रक्कम (संस्थेचे अंशदान व त्यावरील व्याज) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीवर वेळोवळी ठरविण्यात आलेल्या व्याजाच्या दरानुसार वसुल करण्यात यावी. तसेच या कर्मचाऱ्यांनी अंशदायी निवृत्तीवेतन योजनेंतर्गत दरमहा मिळणारे निवृत्तीवेतन घेतले असल्यास ती रक्कमही त्यांच्याकडून वसुल करण्यात यावी. या कर्मचाऱ्यांना त्यांच्या निवृत्तीच्या दिनांकापासून निवृत्तीवेतन व उपदान योजनेचे लाभ द्यावयाचे आहेत. त्यामुळे त्यांना देण्यात येणाऱ्या थकबाकीच्या रकमेतून ही वसुली समायोजित करण्यात यावी. ज्या प्रकरणात देण्यात आलेली रक्कम ही द्यावयाच्या रकमेपेक्षा जास्त असेल त्या प्रकरणात कर्मचाऱ्याकडून अंशदायी भविष्य निर्वाह निधी मधील व्यवस्थापनाचा हिस्सा व त्यावरिल व्याजाची रक्कम जमा करावयाची असून यासाठी नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या जमा लेखाशिर्षामध्ये सदरची रक्कम जमा करण्याची कार्यवाही करावी. सदरचे लेखाशिर्ष स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. संबंधित कर्मचाऱ्यांना अदा करण्यात आलेल्या रकमेची कागदपत्रे तपासून सर्व रक्कम समायोजित/वसुल करण्यात आल्याची खात्री करण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

५. समाजकार्य महाविद्यालयातून दि.१.१.१९९६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन वित्त विभाग शासन निर्णय क्र.सेनिवे १०९९/३०३/सेवा-४ दिनांक १५.११.१९९९ मध्ये दिलेल्या सूचनांनुसार निश्चित करावे.

दि.१.१.१९९६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन वित्त विभाग शासन निर्णय क्र.सेनिवे १०९९/३०२/सेवा-४ दिनांक १५.११.१९९९ मध्ये दिलेल्या सूचनांनुसार निश्चित करावे.

दि.१.१.२००६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन वित्त विभाग शासन निर्णय क्र.सेनिवे १००९/प्र.क्र.२९/सेवा-४ दिनांक ०५.०५.२००९ मध्ये दिलेल्या सूचनांनुसार निश्चित करावे.

दि.१.१.२००६ रोजी किंवा त्यानंतर सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांचे निवृत्तीवेतन वित्त विभाग शासन निर्णय क्र.सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा-४ दिनांक ३०.१०.२००९ व दि.१५.१२.२००९ च्या शुध्दिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार निश्चित करावे.

६. जे कर्मचारी कार्यरत आहेत, त्यांची अंशदायी भविष्य निर्वाह निधीची खाती बंद करण्याची कार्यवाही संबंधित महाविद्यालयांच्या प्राचार्यांनी करावी. तसेच कर्मचाऱ्यांच्या खात्यांमध्ये जमा असलेले संस्थेचे अंशदान व व्याज ही एकत्रित रक्कम यासाठी नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या जमा लेखाशिर्षामध्ये सदरची रक्कम जमा करण्याची कार्यवाही करावी. सदरचे लेखाशिर्ष स्वतंत्रपणे कळविण्यात येईल. संबंधित कर्मचाऱ्यांची भविष्य निर्वाह निधीची खाती उघडून त्यात त्यांचे अंशदायी भविष्य निर्वाह निधीची जमा असलेली रक्कम विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन जमा करण्यात यावी. महाविद्यालयात दि.३१.१०.२००५ पर्यंत नियुक्त कर्मचा-यांकडून या आदेशाच्या दिनांकापासून भविष्य निर्वाह निधी योजनेच्या अंशदानाची वसुली करण्यात यावी.

७. महाविद्यालयात दि.०१.११.२००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना वित्त विभाग शासन निर्णय क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४ दि.३१.१०.२००५ अन्वये लागू केलेली नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू राहील. या योजनेबाबतच्या कार्यपध्दतीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

८. या निवृत्ती वेतन योजनेपोटी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक एन-३

२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण

८००, इतर खर्च

(०३) समाजकल्याण संस्थांना अनुदाने

(०३) (०१) समाजकल्याण संस्थांना अनुदाने

३६, सहायक अनुदाने (वेतन) (२२३५ १५०३)

९. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रं.१२०/२०१४/सेवा-४, दिनांक २२.१०.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२९१२५८०५८९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2014.10.31 12:38:43 +05'30'

( सिध्दार्थ झाल्टे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (१/२) (लेखा अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
६. वित्त विभाग ( कार्यासन सेवा-४), मंत्रालय, मुंबई-३२
७. सर्व प्रादेशिक आयुक्त, समाज कल्याण
८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण
९. प्राचार्य, सर्व अशासकिय अनुदानित समाजकार्य महाविद्यालये
१०. निवडनस्ती /सामासु